पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई या कार्यालयाकरीता नवीन मुख्य प्रशासकीय इमारत उभारण्यासाठीच्या कामास वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२५/प्र.क्र.६१/सां.का.३**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र.स्मारक/प्र.क्र.६१/सां.का.३, दिनांक २८.०३.२०२५
२) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र.जतन/२०२५/E ४६७४२१७, दिनांक २०.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयाची फोर्ट येथील सध्याच्या इमारतीची जागा अपुरी पडत असल्याने सेंट जॉर्ज किल्ला परिसरातील जागेत नव्याने मुख्य प्रशासकीय इमारत बांधण्याबाबत अंदाजित रु.१२,६८,७३,६५२/- इतक्या निधीस उपर्निर्दिष्ट क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता, सदर प्रयोजनार्थ वित्तीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई या कार्यालयाकरीता नवीन मुख्य प्रशासकीय इमारत बांधण्यासाठी रु.३,५०,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पन्नास लक्ष मात्र) इतक्या रकमेस (सर्व करांसहीत) वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरची रक्कम महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडे ठेव अंशदान स्वरुपात (Deposite Contribution Work) ठेवण्यात येईल.

०२. या प्रयोजनार्थ येणारा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) ५३ - मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली त्या-त्या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) “अ” नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयास वित्त विभाग अनौ.सं.क्र.२९१.२०२५/व्यय-१५, दि. ३१ मार्च, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३३१२३२५५३३०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.03.31 23:26:36 +05'30'

**( परसराम न. बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. अपर मुख्य सचिव, (सांस्कृतिक कार्य) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई ४०० ०३२
५. सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, रत्नागिरी
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
११. जिल्हा कोषाधिकारी, रत्नागिरी
१२. निवड नस्ती, सां.का.३.